**अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ नुसार अपंगांसाठी आरक्षणाची गणना करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः** अपंग-२०१४/प्र.क्र.७५/१६-अ

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २८ जुलै, २०१४.

**वाचा :**

१) केंद्र शासनाचे ऑफिस मेमोरेंडम क्र.३६०३५/३/२००४/Estt(Res), दिनांक २९.१२.२००५.
२) शासन परिपत्रक क्र.अपंग-१००९/प्र.क्र.२७६/०९/१६-अ, दिनांक १९.३.२०१०.
३) केंद्र शासनाचे ऑफिस मेमोरेंडम क्र.३६०१२/२४/२००९/ Estt(Res), दिनांक ३.१२.२०१३.

**प्रस्तावना :-**

अपंग व्यक्तींची शासन सेवेत नियुक्ती करताना अनुसरावयाची कार्यपध्दती तसेच अपंग कर्मचा-यांना उपलब्ध करुन द्यावयाच्या सोयीसुविधा, उपकरणे इत्यादी संदर्भात केंद्र शासनाच्या कार्यालयीन ज्ञापन (O.M.) दिनांक २९.१२.२००५ अन्वये मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात आली आहेत. त्यानुसार सर्वांनी कार्यवाही करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत.

केंद्र शासनाच्या सदर दिनांक २९.१२.२००५ च्या कार्यालयीन ज्ञापनाच्या (O.M.) अनुषंगाने शासन पत्र, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक अपंग-२००२/ प्र.क्र.३३१/सुधार-३, दिनांक ७.६.२००६, शासन परिपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक अपंग-२००७/प्र.क्र.६१/सुधार-३, दिनांक २०.४.२००७, तसेच शासन शुध्दीपत्रक, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक अपंग-२००७/प्र.क्र.६१/ सुधार-३, दिनांक २५.५.२००७ आणि शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक न्याय-२००७/स.न्या./प्र.क्र.१०३(भाग-३)/१६-अ, दिनांक १९.१०.२००७ आणि शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक अपंग-१००९/प्र.क्र.२७६/०९/१६-अ, दिनांक १९.३.२०१० अन्वये वेळोवेळी सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार राज्यात अपंग व्यक्तींना शासन सेवेत नियुक्तीबाबत व अन्य सोयीसुविधा व उपकरणे उपलब्ध करुन देणेबाबत कार्यपध्दती अनुसरण्यात येत आहे.

दरम्यान, नॅशनल फेडरेशन ऑफ ब्लाईंड व इतर यांनी मा.सर्वोच्च न्यायालय येथे एस.एल.पी.(सिव्हील) क्रमांक ७५४१/२००९ मध्ये दाखल सिव्हील अपील क्रमांक ९०९६/२०१३ मध्ये मा.सर्वोच्च न्यायालय यांनी दिनांक ८.१०.२०१३ रोजी न्यायनिर्णय दिला असून त्यानुसार केंद्र शासनाच्या दिनांक २९.१२.२००५ च्या कार्यालयीन ज्ञापनामध्ये (O.M.) आवश्यक ती सुधारणा करण्याचे निर्देशित केले.

मा.सर्वोच्च न्यायालयाच्या उपरोक्त निर्णयानुसार केंद्र शासनाच्या मानव संशाधन मंत्रालय (DoPT) यांनी दिनांक ३.१२.२०१३ रोजी कार्यालयीन ज्ञापन (O.M.) निर्गमित केले आहे. केंद्र शासनाच्या दिनांक ३.१२.२०१३ च्या सदर कार्यालयीन ज्ञापनाच्या (O.M.) अनुषंगाने राज्यात अपंग व्यक्तींना शासन सेवेत नियुक्तीबाबत व अन्य सोयीसुविधा व उपकरणे उपलब्ध करुन देणेबाबत अनुसरण्यात येत असलेल्या कार्यवाहीच्या अनुषंगाने सुधारित सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत:-

## शासन परिपत्रक

अपंग कर्मचा-यांच्या नियुक्त्यांबाबत केंद्र शासनाने नॅशनल फेडरेशन ऑफ ब्लाईंड व इतर यांचेविरुध्द एस.एल.पी.(सिव्हील) क्र.७५४१/२००९ मध्ये दाखल केलेल्या सिव्हील अपील क्र.९०९६/२०१३ मध्ये मा.सर्वोच्च न्यायालयाने दिनांक ८.१०.२०१३ रोजी दिलेल्या आदेशाच्या कार्यान्वयीन भागात दिनांक २९.१२.२००५ च्या केंद्र शासनाच्या कार्यालयीन ज्ञापनामध्ये (O.M.) सुधारणा करुन उचित आदेश निर्गमित करण्याच्या सूचना केंद्र शासनास दिल्या आहेत. त्यानुसार केंद्र शासनाने दिनांक ३.१२.२०१३ अन्वये दिनांक २९.१२.२००५ च्या कार्यालयीन ज्ञापनातील परि.१४ मध्ये आवश्यक सुधारणा सुचविणारे कार्यालयीन ज्ञापन (O.M.) निर्गमित केले आहे.

केंद्र शासनाच्या दिनांक ३.१२.२०१३ च्या कार्यालयीन ज्ञापनाच्या (O.M.) परि.५ अन्वये दिनांक २९.१२.२००५ च्या कार्यालयीन ज्ञापनातील (O.M.) परि.१४ (Para १४) मध्ये सुधारणा करण्यांत आली आहे. सदर परि.५ मधील मजकूर खालील प्रमाणे आहे-

"5. Keeping in view the directions of the Hon'ble Supreme Court, Para 14 of the O.M. dated 29.12.2005 is modified to the following extent:

Reservation for persons with disabilities in Group 'A' or Group 'B' posts shall be computed on the basis of total number of vacancies occurring in direct recruitment quota in all the Group 'A' posts or Group 'B' posts respectively, in the cadre. "

राज्य शासन सेवेअंतर्गत अपंग व्यक्तीची पदभरती करताना शासनाच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करणे आवश्यक आहे. सदर धोरणासोबत केंद्र शासनाच्या दिनांक ३.१२.२०१३ च्या कार्यालयीन ज्ञापनातील (O.M.) उपरोक्त सूचनांचेदेखील कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घ्यावी.

हे शासन परिपत्रक शासकीय/निमशासकीय सेवा, मंडळे/महामंडळे, नगरपालिका/ महानगरपालिका, जिल्हा परिषदा, शासकीय अनुदानप्राप्त संस्था आणि ज्यांना मार्गदर्शक आदेश देण्याचा अधिकार शासनाला आहे अशी इतर सर्व प्राधिकरणे, सेवा व संस्था यांना लागू राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१४०७२८१४३७४५९१०७ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINGLE DINESH R

Digitally signed by DINGLE DINESH R
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DINGLE DINESH R
Date: 2014.08.11 17:14:02 +05'30'

**दि.रा.डिंगळे**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रती,**

१) मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई -३२.
२) सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य.
३) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई-४०० ०३५.
४) मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) मा.उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६) सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
१०) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान परिषद) विधानभवन, मुंबई ४०० ०३२.
११) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (विधान सभा) विधानभवन, मुंबई ४०० ०३२.
१२) सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई- ४०० ०३२.
१३) सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई-४०० ०३२.
१४) प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
१५) प्रबंधक, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
१६) प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
१७) प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त, मुंबई.
१८) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१९) सरकारी वकील, उच्च न्यायालय, मूळ शाखा व अपील शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर.
२०) सरकारी वकील, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद, नागपूर.

२१) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता महाराष्ट्र-१, मुंबई.

२२) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता महाराष्ट्र-२, नागपूर.

२३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ (५ प्रती)
**त्यांना विनंती की, प्रस्तुत शासन परिपत्रक प्रसिध्द करण्यात यावे.**

२४) ग्रंथपाल, विधीमंडळ ग्रंथालय, महाराष्ट्र विधानभवन, मुंबई (१० प्रती),

२५) सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी.

२६) सर्व महानगरपालिकांचे आयुक्त.

२७) सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका.

२८) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.

२९) राज्यातील सर्व महामंडळे , मंडळे आणि सार्वजनिक उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक.

३०) सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये, महाराष्ट्र राज्य.

३१) निवड नस्ती/कार्यासन १६-अ.